

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २४४) द्वादशलिंग स्तोत्रम् -१

सौराष्ट्रदेशे विशदेतिरम्ये ज्योतिर्मयं चन्द्रकलावतंसम ।
भक्तिप्रदानाय कृपावतीर्णं तं सोमनाथं शरणं प्रपद्ये ।।१।।

भगवान शंकर यांच्या नावाचा उल्लेख निघाल्या बरोबर प्रत्येक भक्ताच्या मनात येणारी प्रथम गोष्ट म्हणजे द्वादश ज्योतिर्लिंग.

भारतीय संस्कृतीमधील महान उपास्य स्थाने असणाऱ्या या बारा स्थानांचे महत्त्व सांगणारे स्तोत्र आहे द्वादशलिंगस्तोत्र.

या स्तोत्र ला समजून घेताना त्यातील शब्दांपेक्षा त्यामागील कथा समजून घेणे अधिक आनंददायी विषय आहे.

प्रथम स्थान आहे सौराष्ट्र प्रांतातील श्री सोमनाथ.

सोम म्हणजे चंद्र. त्याचा नाथ तो सोमनाथ.

या स्थानाची रोचक कथा अशी आहे की दक्ष प्रजापती यांनी आपल्या २७ कन्या चंद्राला प्रदान केल्या. त्या देत असताना या सगळ्यांवर सारखेच प्रेम करावे अशी विनंती केली.

मात्र कालांतराने चंद्राचे एकट्या रोहिणी प्रति असणाऱ्या विशेष आकर्षणाने संतापलेल्या अन्य पत्नींनी पित्याकडे तक्रार केली.

मागचा पुढचा विचार न करता दक्षांनी शाप दिला, तुझे तेज क्षीण होऊन तू मृतप्राय होशील.

मात्र यात आपल्या मुलींचे नुकसान आहे हे लक्षात आल्यानंतर दक्षाने देवी सती च्या द्वारे भगवान शंकरांना प्रार्थना केली.

श्री शंकरांनी आपले हे आत्मलिंग प्रदान करून गतप्राण झालेल्या चंद्राजवळ त्याची स्थापना करून सर्व नातेवाईकांनी सप्तर्षींसह महामृत्युंजयाचा जप करण्यास सांगितले.

त्याद्वारे चेतना परत आलेल्या चंद्राला भगवंतांनी, जेथे मृत्यू पोहोचू शकणार नाही अशा, आपल्या मस्तकावर धारण केले.

चंद्राला जीवन प्रदान करणाऱ्या त्या स्थानाला श्री सोमनाथ असे म्हणतात.

त्याचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

सौराष्ट्रदेशे विशदेतिरम्ये ज्योतिर्मयं चन्द्रकलावतंसम ।

सौराष्ट्र प्रांतात आकाशामध्ये रम्यपणे विहार करणाऱ्या चंद्राच्या कलेला धारण करणाऱ्या, भक्तिप्रदानाय कृपावतीर्णं तं सोमनाथं शरणं प्रपद्ये । त्याला भक्तिप्रदान करण्यासाठी कृपाळूपणे अवतीर्ण झालेल्या, श्री सोमनाथांना मी शरण जातो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२४५) द्वादशलिंग स्तोत्रम् - २**

श्रीशैलश्रृंगे विबुधातिसंगेतुलाद्रितुंगेपि मुदा वसन्तम ।
तमर्जुनं मल्लिकापूर्वमेकं नमामि संसारसमुद्रसेतुम ।।२।।

द्वादश ज्योतिर्लिंगातील दुसरे स्थान म्हणजे श्रीशैल पर्वतावर असणारे श्री मल्लिकार्जुन क्षेत्र.

या स्थानाला दक्षिण कैलास असे देखील म्हणतात.

क्रौंच नावाच्या पर्वताजवळ असणाऱ्या राजधानीत राहणाऱ्या चंद्रगुप्त नावाच्या राजाला असणारी कन्या कोणत्यातरी संकटामुळे राजवाड्यातून पळून जाऊन जंगलात राहू लागली.

आसपासच्या गोपालक लोकांमध्ये राहणाऱ्या तिच्या आवडत्या कपिला गायीचे दूध कोणीतरी रोज काढतो असे तिला वाटले.

त्या गाईच्या मागावर असताना तिच्या एक अद्भुत गोष्ट लक्षात आली की ती गाय एका शिवलिंगापाशी जाऊन आपोआप दूध देते.

राजकन्येने त्या दिव्य शिवलिंगावर उभारलेली महान शिवस्थान म्हणजे श्री मल्लिकार्जुन.

येथे देवी पार्वती मल्लिका रूपामध्ये निवास करते.

संसार रुपी सागराला तारुण येणारा सेतू स्वरूप असणाऱ्या भगवंताला, त्यांच्या अत्यंत शुद्ध स्वच्छ वित्र अशा पांढर्‍याशुभ्र रंगामुळे अर्जुन असे म्हटले आहे.

मल्लिका रुपात राहणाऱ्या पार्वतीच्या सोबत राहणाऱ्या अशा अर्जुन भगवंताला येथे मल्लिकार्जुन रूपात पूजिले जाते.

आसपास आणिक लहान-सहान वैशिष्ट्यपूर्ण ठिकाणे असणारे हे स्थान.

त्यांचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

श्रीशैलश्रृंगे विबुधातिसंगेतुलाद्रितुंगेपि मुदा वसन्तम ।
तमर्जुनं मल्लिकापूर्वमेकं नमामि संसारसमुद्रसेतुम ।

उत्तुंग असणाऱ्या शैल किंवा तुला नामक पर्वतावर, ऋषिमुनींसह आनंदाने निवास करणाऱ्या, संसार रुपी समुद्रातून तारुण येणाऱ्या सेतू प्रमाणे असणाऱ्या नावापूर्वी मल्लिका असणाऱ्या अर्जुनाला मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २४६) द्वादशलिंग स्तोत्रम् -३

अवन्तिकायां विहितावतारंमुक्तिप्रदानाय च सज्जनानाम ।
अकालमृत्यो: परिरक्षणार्थं वन्दे महाकालमहासुरेशम ।।३।।

आपल्या विश्व प्रसिद्ध असणाऱ्या मेघदूतम् नावाच्या काव्यात महाकवी कालिदास यांनी ज्या नगरीचे वर्णन करताना, वाट वाकडी करावी लागली तरी चालेल पण या नगरीला निश्चित जा. कारण ही सामान्य नगरी नाही. हा पृथ्वीवरील स्वर्गच आहे. कसा? तर

स्वर्गात राहणाऱ्या समस्त पुण्यवंतांनी त्या स्वर्गीय वातावरणाची सवय झाल्यामुळे, आपल्या पुण्याचा उरलेला भाग स्वर्गपतींना देऊन त्याबदल्यात स्वर्गाचा एक छोटासा तुकडा मागितला. तो पृथ्वीवर आणून त्यांनी जेथे ठेवला, या स्थानाला अवंतिका पुरी असे म्हणतात. असे अभूतपूर्व रोमांचक वर्णन केले त्या नगरीला सध्या आपण उज्जैन म्हणून ओळखतो.

तेथे निवास करणारे भगवान श्रीशंकर श्री महाकाल या रूपामध्ये पूजिले जातात. सकल विनाशक काळावर त्यांची सत्ता चालते.त्यामुळे त्यांना महाकाल असे म्हणतात.

काल अर्थात मृत्यू. त्याचे भय सगळ्यात मोठे. या स्थानी भगवान शंकराची उपासना केल्यानंतर अचानक येणाऱ्या मृत्यूचे, अर्थात अकाली मृत्यूचे भय राहत नाही. मृत्यू तर अनिवार्य आहे. पण ज्या शिवकृपेने त्याचे भय नष्ट होते ते भगवान महाकाल.

त्या भगवान महाकाला चे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

अवन्तिकायां विहितावतारंमुक्तिप्रदानाय च सज्जनानाम ।

सज्जनांना मुक्ती प्रदान करण्यासाठी अवंतिका नगरी मध्ये ज्यांनी अवतार धारण केला, आपला निवास करून आपले स्थान तयार केले,

अकालमृत्यो: परिरक्षणार्थं वन्दे महाकालमहासुरेशम ।।

त्या भगवान महाकाल शंकरांना अकाल मृत्युच्या दु:खातून वाचवण्यासाठी मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २४७) द्वादशलिंग स्तोत्र- ४

कावेरिकानर्मदयो: पवित्रे समागमे सज्जनतारणाय ।
सदैव मान्धातृपुरे वसन्तमोंकारमीशं शिवमेकमीडे ।।४।।

देवांचे खजिनदार असणाऱ्या भगवान कुबेरांनी भगवान श्री शंकराची उपासना केल्यानंतर त्यांच्या आनंदा करता भगवान शंकरांनी निर्माण केलेला जलप्रवाह म्हणजे नर्मदेची उपनदी कावेरी.

या कावेरी आणि नर्मदेच्या संगमावर असलेले श्री क्षेत्र म्हणजे श्री ओंकार मांधाता.

हे जसे भगवान कुबेरांचे तपस्यास्थान तसेच श्री मांधाता यांचे पण तपस्या स्थान.

इक्ष्वाकू वंशात झालेल्या युवनाश्व नावाच्या राजाच्या पोटी, पुरुषाच्या पोटी जन्मलेला जगातला प्रथम मानव रुपात पुराणांमध्ये वर्णन केल्या गेलेले दिव्य चरित्र मांधाता.

देवराज इंद्राने आपल्या करंगळीतील अमृताने ज्याला अमृतपान घडविले असा हा महापुरुष.

त्यांच्याच नावावर या क्षेत्राला ओंकार मांधाता असे संबोधिले जाते.

या एकाच मंदिरात पाच मजल्यांवर अनुक्रमे ओमकारेश्वर, महाकालेश्वर, सिद्धनाथेश्वर, गुप्तेश्वर आणि ध्वजेश्वर अशी पाच शिवलिंगे या मंदिरात आहेत.

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या उपासनेचे हे अधिष्ठान. त्यांनी येथे कोट्यावधी शिवलिंगांचे आराधन केले. त्यांनी सुरु केलेली पार्थिव लिंग अर्चनाची पद्धती आजही इथे प्रचलित आहे.

अशा या वैशिष्ट्यपूर्ण ज्योतिर्लिंग स्थानावरील

या शिवलिंगाचे महत्त्व गातांना जगद्गुरु शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

कावेरिकानर्मदयो: पवित्रे समागमे सज्जनतारणाय ।

कावेरी आणि नर्मदा नदीच्या पवित्र संगमावर सज्जनांच्या उद्धारासाठी,

सदैव मान्धातृपुरे वसन्तमोंकारमीशं शिवमेकमीडे - सदैव मांधातृ पुरात निवास करणाऱ्या भगवान शंकरांची आराधना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २४८) द्वादशलिंग स्तोत्रम् -५

पूर्वोत्तरे प्रज्वलिकानिधाने सदा वसन्तं गिरिजासमेतम ।
सुरासुराराधितपादपद्मं श्रीवैद्यनाथं तमहं नमामि ।।५।।

जवा आगळं काशी अर्थात काशी पेक्षा देखील एक जव भर अधिक महत्त्व असलेले स्थान म्हणून प्रसिद्ध असलेले महाराष्ट्र स्थित ज्योतिर्लिंग म्हणजे भगवान परळी वैजनाथ.

कांतीपुरम्, वैजयंतीपुर, जयंती क्षेत्र ,प्रभाकर क्षेत्र अशा नावांनी संस्कृत ग्रंथात वर्णित असणाऱ्या या क्षेत्राचे अनेक वैशिष्ट्ये आहेत.

यादव काळातील प्रधान हेमाद्रीपंत यांनी उभारलेले हे मंदिर. त्यांनी निर्माण केलेल्या शैलीला हेमाद्रीपंती शैली असे म्हणतात. त्याचा अपभ्रंश पुढे हेमाडपंथी असे झाला.

पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांनी या मंदिराचा जीर्णोद्धार केला. भव्य सभागृह, परकोट, पायर्या इत्यादी बांधल्या.

सामान्यता शिवमंदिर सभामंडप पेक्षा खोल असते मात्र येथे समतल रचना असल्याने सभामंडपातून थेट दर्शन होते.

येथे भगवान शंकर सहपरिवार निवास करतात.

येथे भगवान शंकरांनी वैद्यकशास्त्राचे ज्ञान जगाला दिल्यामुळे त्यांचे नाव वैद्यनाथ असे आहे. पुढे त्याचा अपभ्रंश वैजनाथ असा झाला.

भव्य सभागृह, लांबच लांब दगडी पायऱ्या, नजरेत भरणारा परकोट या मंदिराची वैशिष्ट्ये.

चैत्र पौर्णिमा आणि अश्विन पौर्णिमेला सूर्यकिरणे थेट भगवान वैजनाथच्या ज्योतिर्लिंगला स्पर्श करतात हे आणखीन एक वैशिष्ट्य.

अशा या महाराष्ट्र स्थित ज्योतिर्लिंगाचे वैभव सांगतांना आचार्य श्री म्हणतात,

पूर्वोत्तरे - पूर्व उत्तर अर्थात ईशान्य दिशा ही भगवान शंकरांची दिशा वर्णिलेली आहे. वास्तुशास्त्रातही त्यांचे स्थान तेथे वर्णिले आहे.

प्रज्वलिकानिधाने - प्रज्वलिका अर्थात पेटलेली चिता. तिचे स्थान अर्थात स्मशान.

सदा वसन्तं - तेथे सदैव निवास करणारे. गिरिजासमेतम - आई जगदंबा पार्वती यांच्या समवेत आहे असे.

सुरासुराराधितपादपद्मं - सुर म्हणजे देवतां आणि असुर म्हणजे राक्षस यांनी चरणकमलांची सेवा केलेल्या

श्रीवैद्यनाथं तमहं नमामि - त्या भगवान वैद्यनाथांना मी नमस्कार करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २४९) द्वादशलिंगस्तोत्रम् -६

याम्ये सदंगे नगरेऽतिरम्ये विभूषितांग विविधैश्च भोगैः ।
सद्भक्तिमुक्तिप्रदमीशमेकं श्रीनागनाथं शरणं प्रपद्ये ।।६।।

भगवान शंकरांच्या या बारा दिव्य ज्योतिर्लिंगांपैकी पाच वैभवशाली स्थाने महाराष्ट्रामध्ये आहेत. त्यापैकी बालाघाटच्या पर्वतरांगांमध्ये निसर्गरम्य परिसरात विराजमान असणारे वैशिष्ट्यपूर्ण स्थान म्हणजे श्रीक्षेत्र औंढा नागनाथ.

या क्षेत्राची प्राचीन नाव आमर्दकपूर. सर्व दुष्टांचा विनाश करणारे भगवान शंकर आमर्दक या नावाने ओळखले जातात.

याच नावाने शिव उपासना करणारा ही शैव पंथ देखील प्रचलित आहे. ते स्वतःला आमर्दक संतान असे म्हणतात.

या क्षेत्राचे दुसरे नाव म्हणजे दारुकावन. दारूक नावाचा राक्षसाच्या विनाशासाठी भगवान शंकर येथे प्रकट झाले आणि त्यानंतर तेथेच निवास करते झाले. अशी या क्षेत्राची कथा आहे.

अनुज्ञान नागनाथ, नागेश्वर अशा नावांनी देखील या स्थानाचा उल्लेख प्राचीन ग्रंथांमध्ये मिळतो.

वेरूळ अजिंठ्याच्या शिल्प कामाशी तुलना करावी इतके या मंदिराचे बांधकाम रेखीव आहे.

कनकेश्वरी देवीच्या जवळ १२९४ च्या उल्लेखासह सापडलेल्या शिलालेखानुसार मंदिराचे प्राचीनत्व इतके तर निश्चितच जुने आहे.

त्याच्याही पूर्वी वाकाटक राष्ट्रकूट राजघराण्याचा या मंदिराशी संबंध असल्याचे उल्लेख आहेत.

अशा या वैशिष्ट्यपूर्ण ज्योतिर्लिंग स्थानाचे वैभव सांगतांना आचार्य श्री म्हणतात,

याम्ये सदंगे - याम्य म्हणजे दक्षिण दिशेला.

दक्षिण दिशेचे अधिपती भगवान यमराज असल्याने त्या दिशेला याम्य दिशा असे म्हणतात.

नगरेऽतिरम्ये - अत्यंत रमणीय अशा नगरांमध्ये.

विभूषितांग

विविधैश्च भोगैः -

विविध भोगांच्याद्वारे अंग सुशोभित केलेले.

सद्भक्तिमुक्तिप्रदमीशमेकं

सुयोग्य भक्ती आणि मुक्ती प्रदान करणाऱ्या, या संपूर्ण विश्वाचे एकमेव स्वामी असणाऱ्या,

श्रीनागनाथं शरणं प्रपद्ये ।। भगवान श्री नागनाथांना मी शरण जातो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २५०) द्वादश लिंग स्तोत्रम् - ७

सानन्दमानन्दवने वसन्तम्
आनन्दकन्दं हतपापवृन्दम ।
वाराणसीनाथम्
अनाथनाथं श्रीविश्वनाथं शरणं प्रपद्ये ।।७।।

आनंदवन, आनंदकानन, अविमुक्त नगरी, तपस्थली, महास्मशान, मुक्तिधाम, रुद्रावास अशा अनेकानेक नावांनी हजारो संस्कृत ग्रंथांमध्ये गौरविलेला स्वर्गीय प्रांत म्हणजे वाराणसी काशी.

असी आणि वरुणा अशा दोन नद्यांच्या संगमावर ही नगरी वसली असल्यामुळे हिला वाराणसी असे म्हणतात.

आयुष्यात एकदा तरी तिचे दर्शन व्हावे आणि जमल्यास आयुष्याचा अंत तेथे व्हावा अशी इच्छा प्रत्येक भारतीय श्रद्धाळू मनात निवास करते ती नगरी म्हणजे काशी.

८८ घाट आणि सार्वजनिक स्वरूपातील तब्बल १६५४ मंदिरे हे काशीचे अद्वितीय वैशिष्ट्य.

शैव, वैष्णव, गाणपत्य, शाक्त, सौर या सगळ्याच पंथांना काशी परम वंदनीय आहे.

केवळ भगवान गणेशांचा विचार करायचा तरी काशीचे ५६ विनायक विश्वविख्यात आहेत.

काशी के कंकर
सब शंकर ही शंकर

अर्थात काशीतला प्रत्येक पाषाण भगवान शंकर स्वरुपच आहे. इतके या नगरीचे आणि भगवान शंकरांचे एकरूपत्व.

या नगरीमध्ये भगवान विश्वनाथ निवास करतात.

वर्णनाच्या सर्व मर्यादा गळून पडणाऱ्या या अद्वितीय स्थानाच्या वंदना साठी आचार्यश्री शब्द वापरतात,

सानन्दम्- सदैव आनंदस्वरूप असणारे आनंदवने वसन्तम् - आनंदवन अशा काशीनगरीत निवास करणारे.

आनन्दकन्दं- अंतर्बाह्य केवळ आणि केवळ आनंदाने भरगच्च असणारे. हतपापवृन्दम - सगळ्या पाप समुदायाचा विनाश करणारे.

वाराणसीनाथम्- वाराणसी नगरीचे नाथ असणाऱ्या,

अनाथनाथं - विश्वातील सकल अनाथांचे नात असणाऱ्या, श्रीविश्वनाथं शरणं प्रपद्ये - श्री विश्वनाथांना मी शरण जातो..



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २५१) द्वादशलिंग स्तोत्रम् - ८

यो डाकिनीशाकिनिकासमाजे निषेव्यमाणः पिशिताशनैश्च ।
सदैव भीमादिपदप्रसिद्धं तं शंकरं भक्तहितं नमामि ।।८।।

महाराष्ट्रामध्ये पसरलेल्या सह्याद्रीच्या डोंगर रांगात पुणे जिल्ह्यातील खेड तालुक्यात भीमा नदीचे उगमस्थान म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या निसर्गरम्य निवास करणारे भगवान शंकरांचे ज्योतिर्लिंग स्थान म्हणजे श्री भीमाशंकर.

अभयारण्य स्वरूपात आरक्षण केल्या गेले असल्याने अत्यंत निसर्गरम्य या परिसरात अनेक वन्यजीव तथा याच प्रांतात विशेषत्वाने पाहायला मिळणारी शेकरू म्हणजे उडणारी खार हे या परिसराचे वैशिष्ट्य.

कुंभकर्णाचा पुत्र असणाऱ्या भीम नामक राक्षसाने तपस्या करून भगवान विष्णूंना देखील पराजित केले. त्यानंतर त्याने सुदक्षिण नावाच्या शिवभक्त राजावर आक्रमण करून तो पूजा करीत असलेल्या पार्थिव शिवलिंगावर प्रहार करण्याचा प्रयत्न करताच त्यातून भगवान शंकर प्रकट झाले आणि त्या राक्षसाचा विनाश केला त्यामुळे या स्थानाला भीमाशंकर म्हणण्याची पद्धत पडली.

हिमाद्री पंथी बांधणीचे अत्यंत सुबक कोरीव काम , चिमाजी आप्पा यांनी आणलेली पाच मणाची मोठी घंटा येथील आकर्षण स्थाने.

या भगवान भीमाशंकर यांचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात, यो डाकिनीशाकिनिकासमाजे - जय भगवान शंकर डाकिनी शाकिनी इत्यादींच्या समाजामध्ये हे,

निषेव्यमाणं पिशिताशनैश्च - भूतप्रेत इत्यादींच्या द्वारे सेवा केले जातात.

सदैव भीमादिपदप्रसिद्धं - आपल्या भक्तांना जे भीम म्हणजे विशाल फल प्रदान करतात,

तं शंकरं भक्तहितं नमामि - त्या भक्त हितकारी भगवान शंकरांना मी नमन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २५२) द्वादश लिंग स्तोत्रम् -९

सुताम्रपर्णीजलराशियोगे निबध्य सेतुं विशिखैरसंख्यै: ।
श्रीरामचन्द्रेण समर्पितं तं रामेश्वराख्यं नियतं नमामि ।।९।।

भगवान श्रीरामचंद्रांनी लंकेवर चढाई करण्यापूर्वी सेतुबंधासाठी आणि लंका विजयासाठी विशेष अनुष्ठान स्वरूपात ज्या स्थानाची निर्मिती केली ते लोकोत्तर स्थान म्हणजे श्रीक्षेत्र रामेश्वर.

येथे क्षेत्राचे नावही रामेश्वर आहे. भगवंताचे देखील नाव रामेश्वरच आहे.

मोठा सुंदर आहे हा शब्द. रामेश्वर शब्दाचा अर्थ सांगताना भगवान राम म्हणतात रामाचा जो ईश्वर तो रामेश्वर. पण गंमत म्हणजे त्याच वेळी देवी पार्वतीला भगवान शंकर म्हणतात राम ज्याचा ईश्वर तो रामेश्वर.

शैव आणि वैष्णव संप्रदायाच्या अशा एकात्मतेचे प्रतीक आहे, श्रीक्षेत्र रामेश्वर.

ताम्रपर्णी नदीचा समुद्राशी संगम होणाऱ्या पवित्र स्थानावर दक्षिणकाशी रूपात हे स्थान विराजमान आहे.

विश्वातील सगळ्यात मोठा प्रदक्षिणामार्ग असणाऱ्या या स्थानाचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

सुताम्रपर्णीजलराशियोगे - ताम्रपर्णी आणि समुद्राच्या संगमावर,

निबध्य सेतुं विशिखैरसंख्यै: - अनेक पाषाणांच्या द्वारे सेतू निर्माण करून,

येथे आचार्य श्री विशिख असा विशेष शब्द वापरतात. शिखा म्हणजे टोक. टोकदार नसलेले गुळगुळीत दगड, वापरून सेतु ची निर्मिती झाली. त्यावरून चालत जाण्या करतात ते उपयोगी होते हा बारकावा आचार्य श्री सहज सुचवतात.

श्रीरामचन्द्रेण समर्पितं तं - श्रीरामचंद्रांनी ज्यांना समर्पित केला. अर्थात या कर्माचे फळ ज्या भगवंताला दिले. ज्यांच्या कृपेमुळे हे शक्य झाले असे म्हणून आपल्या कर्माचे फळ ज्या भगवंताच्या चरणी समर्पित केले

रामेश्वराख्यं नियतं नमामि - त्या श्री रामेश्वरांना मी सदैव वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २५३) द्वादशलिंग स्तोत्रम् - १०

सह्याद्रिशीर्षे विमले वसन्तं गोदावरीतीरपवित्रदेशे ।
यद्दर्शनात्पातकमाशु नाशं प्रयाति तं त्र्यम्बकमीशमीडे ॥८॥

भारतीय संस्कृतीचे सगळ्या विश्वाला आश्चर्यचकित करणारे वैशिष्ट्य असणाऱ्या,

सिंहस्थ कुंभमेळ्याची महापर्वस्थान स्वरूपात विश्वविख्यात असणारी नगरी म्हणजे श्री क्षेत्र त्र्यंबकेश्वर. दिगंबर निर्वाणी आणि निर्मोही अशा तीन आखाड्यांच्याद्वारे सूर्याचा सिंह राशीतील भ्रमण काळात या महा कुंभाचे आयोजन केले जाते.

श्री क्षेत्र त्र्यंबकेश्वर येथे शैवपंथाचा तर श्रीक्षेत्र नाशिक येथे वैष्णव संप्रदायाचा सिंहस्थ पर्वकाळ साजरा केला जातो.

गोदावरीचे उगमस्थान, संत शिरोमणी निवृत्तीनाथांची समाधी ही या क्षेत्राची आणखी वैशिष्ट्ये.

कालसर्प शांती साठी, नागबली ,नारायण बलीसाठी जगात त्र्यंबकेश्वर विख्यात आहे.

दहाव्या शतकात शिलाहार वंशातील झंझ राजाने गोदावरी ते भीमा बारा नद्यांच्या उगमस्थानावर शिव मंदिराची उभारणी केली त्यापैकी हे प्रथम स्थान.

येथे शिवपिंडी च्या जागी तीन उंचवटे असल्याने ब्रह्मा, विष्णू, महेश यांचे एकत्रित निवासस्थान असे अद्भुत महात्म्य या स्थानाला प्राप्त झाले आहे.

भगवान रामचंद्र यांची कर्मभूमी असणार्या नाशिकच्या जवळ असणाऱ्या या क्षेत्राचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

सह्याद्रिशीर्षे विमले वसंतम् - सह्य पर्वताच्या परमशुद्ध, निर्मल शिखरावर निवास करणाऱ्या,

गोदावरीतीरपवित्रदेशे - गोदावरी नदीच्या तीरावरील पवित्र प्रदेशात,

यद्दर्शनात्पातकमाशु नाशं प्रयाति - ज्यांच्या दर्शनाने सगळी पातके तत्काळ दूर होतात,

तं त्र्यम्बकमीशमीडे - त्या भगवान त्र्यंबकांना मी पूजितो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२५४) श्री द्वादशलिंग स्तोत्र- ११**

महाद्रिपार्श्वे च तट रमन्तं
सम्पूज्यमानं सततं मुनीन्द्रैः ।
सुरासुरैर्यक्षमहोरगाद्यैः
केदारमीशं शिवमेकमीडे ।।११।।

पृथ्वीवरील स्वर्ग स्वरूपात ज्या हिमालयीन पर्वतरांगांचे वर्णन केले जाते त्या शब्दातीत सौंदर्यशाली प्रांतात असणारे अद्वितीय शिवस्थान म्हणजे श्री केदारनाथ.

एका बाजूला केदार दुसऱ्या बाजूला खर्च कुंड तर तिसर्या बाजूला भरत कुंड आता तीन पर्वतांच्या संरक्षणात असणारे हे अद्वितीय स्थान.

मंदाकिनी, मधुगंधा, क्षीरगंगा, सरस्वती आणि स्वर्णगौरी असे पाच जलप्रवाह कधीकाळी येथे प्रवाहित होते.

भगवान श्रीविष्णु चे स्वरूप असणाऱ्या नर आणि नारायण नामक महर्षींचे हे तपस्या स्थान. त्यांना दर्शन देण्यासाठी भगवान केदारनाथ स्वरूपात येथे प्रकट झाले.

२०१३ च्या महाभीषण प्रलयात देखील दिमाखात उभे असणारे हे मंदिर सर्वप्रथम पांडवांनी उभारले असे वर्णन आहे. त्यानंतर भगवान जगद्गुरु आदी शंकराचार्य स्वामींनी यांचा जीर्णोद्धार केला.

अक्षय तृतीया ते कार्तिकी पौर्णिमा याच काळात दर्शनासाठी मुक्त असणाऱ्या इतर वेळी बर्फाच्छादित असणाऱ्या या वैशिष्ट्यपूर्ण स्थळाचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

महाद्रिपार्श्वे च तट रमन्तं - विश्वातील सगळ्यात मोठा पर्वत म्हणजे हिमालयाच्या तटावर असणारे,

सम्पूज्यमानं सततं मुनीन्द्रैः - नरनारायणां सह सकल ऋषी मुनींकडून सतत पूजिल्या जाणारे,

सुरासुरैर्यक्षमहोरगाद्यैः - सुर म्हणजे देवता, असुर म्हणजे राक्षस, यक्ष आणि महा उरग म्हणजे नाग यांच्याद्वारे पूजिल्या जाणाऱ्या,

केदारमीशं शिवमेकमीडे - भगवान श्री केदारनाथ शंकरांची मी उपासना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२५५) द्वादशलिंग स्तोत्रम् -१२**

इलापुरे रम्यविशालकेऽस्मिन समुल्लसन्तं च जगद्वरेण्यम ।
वन्दे महोदारतरस्वभावं घृष्णेश्वराख्यं शरणं प्रपद्ये ।।१२।।

शिवपुराण, स्कंदपुराण, रामायण महाभारत अशा प्राचीन ग्रंथात विशेष वर्णन केलेले भगवान शंकरांचे ज्योतिर्लिंग स्थान म्हणजे श्रीक्षेत्र घृष्णेश्वर.

येलगंगा नदीच्या किनाऱ्यावर असल्यामुळे या स्थळाला येलापुर असे नाव आहे. त्याचा अपभ्रंश इलापुर,ऐलापुर, एलोरा करत वेरूळ पर्यंत आला.

आज कैलास आणि इतर लेण्यांमुळे विश्वविख्यात असलेला हा प्रांत. सुधर्मा नावाच्या ब्राह्मणाच्या घुष्णा नामक पत्नी अत्यंत निस्सीम शिवभक्त होती.

ती नित्य शंभर शिवलिंगांचे पूजन करीत असे. तिच्या या वैशिष्ट्यपूर्ण व्रताने संतुष्ट होऊन तिला दर्शन देण्यासाठी आलेले भगवान येथे तिच्या नावाला आपल्या नावात धारण करून, श्रीघृष्णेश्वर या नावानेच येथे विराजमान आहेत.

हिंदुहृदय सम्राट छत्रपती शिवरायांचे आजोबा श्रीमंत मालोजीराजे भोसले यांनी या मंदिराचा जीर्णोद्धार केला. त्यानंतर पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांनीही  जीर्णोद्धार केला असा येथील इतिहास.

याचे वैभव वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

इलापुरे रम्यविशालकेऽस्मिन् - या रम्य आणि विशाल अशा इलापुरामध्ये, समुल्लसन्तं च जगद्वरेण्यम - निवास करणाऱ्या जगातील सर्वश्रेष्ठ अशा,

वन्दे महोदारतरस्वभावं - महान उदार असा स्वभाव असणाऱ्या,

त्यामुळेच घृष्णेला तिचा गमावलेला पुत्र परत करणाऱ्या, तसेच शरण आलेल्या भक्तांच्या सकल मनोकामना पूर्ण करणाऱ्या,

घृष्णेश्वराख्यं शरणं प्रपद्ये - भगवान श्रीघृष्णेश्वरांना मी शरण जाऊन वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२५६) द्वादश ज्योतिर्लिंग स्तोत्र -१३**

ज्योतिर्मयद्वादशलिंगानां शिवात्मनां प्रोक्तमिदं क्रमेण ।
स्तोत्रं पठित्वा मनुजोऽतिभक्त्या फलं तदालोक्य निजं भजेच्च ॥१३॥

ज्याप्रमाणे पूर्णाहुती शिवाय यज्ञाला सांगता प्राप्त होत नाही त्याचप्रमाणे फलश्रुती शिवाय स्तोत्राची सांगता होत नसते या भारतीय दंडकाचा विचार करून, आचार्यश्रींनी रचलेला हा फलश्रुतीचा श्लोक.

साधकांच्या भक्तांच्या दृष्टीने फलश्रुतीला फार वैशिष्ट्यपूर्ण स्थान नसले तरी, सर्वसामान्य माणूस यात वर्णन केलेल्या फळाच्या आधारे भक्ती मार्गाला लागतो त्यामुळे फलश्रुती वर्णन केलेली असते.

आचार्य श्री फलश्रुतीच्या पद्धतीप्रमाणे प्रथम तीन चरणात स्तोत्र कसे म्हणावे ? ते सांगताना म्हणतात,

ज्योतिर्मयद्वादशलिंगानां शिवात्मनां प्रोक्तमिदं क्रमेण ।

स्तोत्रं पठित्वा मनुजोऽतिभक्त्या - या बारा ज्योतिर्लिंगांचे हे भगवान शंकराचे स्तोत्र जो मनुष्य अतीव भक्तिभावाने पठन करीन,

अर्थात हे स्तोत्र केवळ म्हणायचे म्हणून नव्हे तर त्यामागे भक्तीपूर्ण अंत:करण असेल तर अशा भक्ताला काय काय प्राप्त होते हे सांगताना शेवटच्या ओळींमध्ये आचार्यश्री वर्णन करतात,

फलं तदालोक्य निजं भजेच्च - तो निज फलाला प्राप्त होतो.

निज शब्दाचे दोन अर्थ आहेत. वाचणाऱ्याच्या दृष्टीने निज म्हणजे त्याचे स्वतःचे. अर्थात त्याच्या स्वतःच्या ज्या कोणत्या इच्छा असतात, सगळ्या इच्छा यास स्तोत्र आणि प्राप्त होतील. पूर्ण होतील.

तर निजाम म्हणजे भगवान शंकरांचे स्वतःचे निवासस्थान अर्थात कैलास.

या देहात असेपर्यंत सर्व इच्छा पूर्ण होतील आणि हा देह सुटल्यावर भगवान शंकरांच्या कैलास लोकात स्थान मिळेल.

असे दोन्ही अर्थ आचार्य श्री या एकाच शब्दातून सादर केलेले आहेत.

नमः शिवाय !